**डॉ.बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरेच्या कामकाजाची चौकशी करण्यासंदर्भात समिती गठीत करण्याबाबत.**

-------------------------------------------

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र. : बैठक-२०२५/प्र.क्र.२७)/ तांशि-२**

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २४ मार्च, २०२५

**पहा :-**

१. **शासनाकडे प्राप्त झालेली वि.स.स.श्री. संजय पुराम, वि.प.स. श्री.अभिजित वंजारी, वि.स.स. श्री.वरुण सरदेसाई, व्यवस्थापन परिषद सदस्य मुंबई विद्यापीठ, इत्यादींची निवेदने**
२. **संचालक, तंत्रशिक्षण यांचे पत्र क्र.२/एन.जी.सी/DBATU माहिती/२०२५/९७, दि.१०.०२.२०२५**

**प्रस्तावना :-**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे या विद्यापीठामधील कामकाजाबाबत शासनाकडे प्राप्त झालेल्या तक्रारी व त्या अनुषंगाने संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांनी शासनाला सादर केलेल्या अहवालावर विचार होऊन या सर्व तक्रारींची सखोल चौकशी करण्यासाठी सेवानिवृत्त आय.ए.एस अधिकारी श्री. किशोरराजे निंबाळकर यांच्या अध्यक्षतेखाली सेवानिवृत्त तंत्रशिक्षण संचालक श्री. बी.एन. पासलकर तसेच सह संचालक श्री. भामरे यांची त्रिसदस्यिय समिती गठीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**प्रकरणाची पार्श्वभूमी व घटनाक्रम** :-

**१) पार्श्वभूमी** :- डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे या विद्यापीठाची स्थापना डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ अधिनियम, २०१४ अन्वये करण्यात आली आहे. या विद्यापीठाचे कार्यक्षेत्र आता संपुर्ण महाराष्ट्र करण्यात आले असून, राज्याच्या विविध विभागातील महाविद्यालये विद्यापीठास संलग्नित आहेत. या विद्यापीठाचे मुख्य केंद्र लोणेरे हे असून पुणे, औरंगाबाद व नागपूर येथे विभागिय केंद्रे व सोलापूर, कोल्हापूर, जळगाव या ठिकाणी उपकेंद्रे आहेत.

राज्यात अभियांत्रिकी तंत्रशास्त्र व तदनुषंगिक शास्त्रांचा विकास करणे, त्यामधील संशोधनकार्याला चालना देणे, राज्याच्या मागास क्षेत्रामध्ये तसेच अशा ज्ञानापासून वंचीत राहीलेल्या व्यक्तिंमध्ये तंत्रशास्त्राचा प्रसार करणे, राज्याच्या मागास क्षेत्राच्या आर्थिक विकासासाठी सर्व स्तरावर तंत्रशास्त्र विषयक ज्ञानाचा प्रचार व प्रसार करणे आदि विशिष्ठ उद्धेशाने या विद्यापीठाची स्थापना करण्यात आली असून त्यासाठी शासनाकडून आवश्यक त्या पायाभूत सोयीसुविधा उपलब्ध करुन देण्यात आल्या आहेत. विज्ञान आणि तंत्रज्ञानाच्या अभ्यासातुन तंत्रज्ञानदृष्ट्या प्रगत युवकांची निर्मिती होऊन शक्तिशाली राज्य उभा करणे हा या कायद्याचा मुळ हेतू आहे.

**२) <u>विद्यापीठासंदर्भातील तक्रारी</u> :-** परंतु अलिकडच्या काळात विद्यापीठाच्या कामकाजामध्ये शिथिलता येऊन अनागोंदी माजली असल्याच्या आशयाच्या काही तक्रारी विद्यार्थी, विद्यार्थ्यांचे पालक, काही संघटना तसेच लोकप्रतिनिधींकडुन शासनाकडे प्राप्त होत होत्या. त्यामध्ये प्रमुख्याने परिक्षांचा निकाल विलंबाने लावणे, ERP पोर्टल बऱ्याच कालावधीसाठी बंद पडल्याने ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांची कुचंबना होणे, उत्तर पत्रिका योग्य प्रकारे न तपासणे जाणे, निकालामध्ये अनेक त्रुटी असणे, विद्यार्थ्यांना विद्यापीठाशी संपर्क साधण्यासाठी मध्यमांची सुविधा (हेल्प लाईन, मेल, कॉल सुविधा इ.) उपलब्ध नसल्यामुळे विद्यार्थ्यांची गैरसोय होणे, पेपर फुटीची प्रकरणे, कॅरी ऑन पध्दतीची अंमलबजावणी न करणे, विद्यापीठाच्या रिक्त पदावरील अधिकारी/कर्मचारी वर्ग भरण्यासाठी करावयाच्या पाठपुराव्यामध्ये अनागोंदी अवस्था असणे, विद्यापीठाच्या विकास कामासाठी वितरित केलेल्या निधिचे नियोजन आणि व्यवस्थापन योग्य रितीने केले नसल्याने शासकीय निधीचा अपव्यय होणे अशा आशयाच्या अनेक तक्रारींचा समावेश आहे.

**३) <u>संचालकांचा अहवाल</u>** :- या तक्रारीं संदर्भात चौकशी करुन अहवाल देण्याच्या सुचना संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय यांना देण्यात आल्या असता त्यांनी दि. १०/०२/२०२५ रोजी शासनाला सादर केलेल्या अहवालात, प्रस्तुत तक्रारींना दुजोरा दिला असून इतर अकृषीक विद्यापीठांच्या तुलनेने अकार्यक्षम असलेली शैक्षणिक कार्यप्रणाली, विद्यार्थीस्नेही नसलेली यंत्रणा, संपर्कातील उणिवा, संलग्नित संस्थांना न मिळणारा सकारात्मक प्रतिसाद आणि त्यामुळे संलग्निकरण रद्द करण्याबाबत त्यांची झालेली मानसीकता तसेच संचालनालयाच्या पत्रव्यवहारास विद्यापीठाकडुन द्यावयाच्या प्रतिसादास होणारा विलंब इत्यादी बाबींमुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठाकडुन पुरेशा गांभिर्याने कार्यवाही होत नाही, असा निष्कर्ष संचालकांनी काढल्याचे दिसून येते. तसेच या गंभीर बाबींमुळे डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ अधिनियम, २०१४ मधील कलम ९४ नुसार शासनस्तरावरुन उचित कार्यवाही करण्यात यावी अशी शिफारस संचालकांनी केली आहे.

त्या अनुषंगाने डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ अधिनियम, २०१४च्या कलम ९४ अंतर्गत कुलगुरु, डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ यांना दि.२७.०२.२०२५ रोजी नोटीस बजावण्यात आली. विद्यापीठाचे कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, यांनी त्यांच्या दि. १०.०३.२०२५ च्या पत्राव्दारे सदर नोटीशीचा खुलासा सादर केला आहे. सदरहु खुलाशामध्ये विद्यापीठाने तक्रारींच्या मुद्यावरील त्यांचे अभिप्राय सादर केले असून तक्रारीतील मुद्यांबाबत आवश्यक ती कार्यवाही करुन त्या निकाली काढल्या असल्याचे स्पष्ट केले आहे. विद्यापीठाच्या अहवालातील स्पष्टीकरण विचारात घेऊन विद्यापीठाचा कारभार अधिक पारदर्शक, लोकाभिमुख व गतिमान व्हावा यासाठी या प्रकरणातील तथ्यांची सविस्तर चौकशी करण्यासाठी मा. मंत्री (उ.व तं.शि.) यांनी दिलेल्या निर्देशानुसार श्री. किशोरराजे निंबाळकर यांच्या अध्यक्षतेखाली निवृत्त तंत्रशिक्षण संचालक श्री. न.बा. पासलकर व सह संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय डॉ. सुनिल भामरे यांची त्रिसदस्यीय समिती गठीत करण्याचा प्रस्ताव विचाराधिन होता.

उपरोक्त पार्श्वभूमीवर पुढीलप्रमाणे आदेश जारी करण्यात येत आहेत.

## **शासन निर्णय**

डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे या विद्यापीठामधील कामकाजाबाबत शासनाकडे प्राप्त झालेल्या तक्रारींच्या अनुषंगाने सखोल चौकशी करण्यासाठी किशोरराजे निंबाळकर (सेवानिवृत्त आय.ए.एस) यांच्या अध्यक्षतेखाली निवृत्त तंत्रशिक्षण संचालक श्री. बी.एन. पासलकर व सह संचालक डॉ. सुनिल भामरे यांची त्रिसदस्यिय समिती गठीत करण्यात येत असून समितीची कार्यकक्षा, कालावधी आदी बाबी पुढीलप्रमाणे राहतील.

**अ) समितीची कार्यकक्षा** :- विद्यापीठासंदर्भात विद्यार्थी, विद्यार्थ्यांचे पालक, काही संघटना तसेच लोकप्रतिनिधींकडुन प्राप्त झालेल्या तक्रारी, विद्यापीठाशी संलग्नित संस्थांकडुन तंत्रशिक्षण संचालनालयाकडे प्राप्त झालेल्या तक्रारी, संचालकांकडुन विद्यापीठाच्या कामकाजाबाबत प्राप्त झालेला तपशिल, विद्यापीठाच्या कर्मचाऱ्यांच्या काही तक्रारी असल्यास अशा तक्रारी इत्यादी बाबतची सविस्तर व सखोल चौकशी समिती करेल. विद्यापीठाचा मूळ हेतू साध्य होण्यास या तक्रारींमुळे बाधा पोचत असेल तर विद्यापीठ अधिनियम तसेच शासनाचे धोरण व त्यानुषंगाने जारी केलेले स्थायी आदेश आदी बाबी विचारात घेवून त्यासंदर्भात करावयाच्या उपाययोजना व कार्रवाई याबाबत शासनाला आपल्या शिफारशी सादर करेल.

**ब) कालावधी** :- अशा प्रकारच्या तक्रारींची सविस्तर व सखोल चौकशी समिती गठण झालेल्या दिनांकापासुन एक महिन्यात करेल आणि त्याबाबतचा अहवाल त्यानंतर आठ दिवसात शासनाला सादर करेल.

**क) सोयी-सुविधा** :- समितीला चौकशी करणे सोयीचे व्हावे यासाठी विद्यापीठाच्या लोणेरे येथील मुख्यालयात आवश्यकते प्रमाणे बैठक व्यवस्था तसेच निवासाची व्यवस्था करण्याच्या सुचना विद्यापीठाला देण्यात येतील. चौकशीच्या कामकाजासाठी समितीला आवश्यक असलेला कर्मचारी वर्ग तसेच कार्यालयीन वस्तुंची उपलब्धता करण्याच्या सुचना विद्यापीठास देण्यात येतील. तसेच तक्रारीच्या अनुषंगाने आवश्यक असलेली अन्य सर्व माहिती उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी विद्यापीठाचे कुलसचिव तसेच संचालनालयाची राहिल आणि त्यासाठी संचालक तसेच कुलसचिव यांनी आवश्यक ती माहिती देण्यासाठी जबाबदार अधिकाऱ्याची नियुक्ती करावी.

**ड) भत्ते** :- अशा प्रकारे चौकशीसाठी नियुक्त करण्यात येणाऱ्या समितीसाठी शासनाच्या धोरणानुसार अनुज्ञेय ठरणारे भत्ते समितीला देय राहतील. यावरील होणारा खर्च विद्यापीठाच्या स्वनिधी/स्वियप्रपंची लेख्यामधुन भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२४१६१६१९४१०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने

KESHAV SADASHIV JADHAV

Digitally signed by KESHAV SADASHIV JADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT,
2.5.4.20=5438b460c94573ba7047e202baee7b8f7afc7bcebf84d4ba7264d8ac8a4eae28, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=D426E30CF15295B9F4AB90CA67789667C00A3FFA9D11A5046B95708ED51F852A, cn=KESHAV SADASHIV JADHAV
Date: 2025.03.24 16:17:21 +05'30'

**(केशव स. जाधव)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.

२. मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. मंत्री, उच्च व तंत्रशिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
५. संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
६. समिती अध्यक्ष श्री. किशोरराजे निंबाळकर, सेवानिवृत्त आय.ए.एस. शिवालय, एरंडवणा, पुणे.
७. समिती सदस्य, श्री.बी.एन.पासलकर,( निवृत्त संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय ) ( तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत )
८. समिती सदस्य श्री. भामरे, सह संचालक, तंत्रशिक्षण संचालनालय. (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
९. सहसंचालक, मुंबई विभागीय कार्यालय, (तंत्रशिक्षण संचालनालयामार्फत)
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई/निवासी लेखा परीक्षा अधिकारी..
११. कुलगुरू, डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे.
१२. कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर तंत्रज्ञान विद्यापीठ, लोणेरे
१३. निवड नस्ती (तांशि-२)